महाराष्ट्र वानिकी प्रकल्पांखालील उत्पादन वानिकी कार्यक्रमांतर्गत अस्थाई पदे सन २०१८-१९ मध्ये चालू ठेवण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक:-एफडीएम -२०१८/प्र.क्र.२८/फ-२**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,**
**दिनांक :- २४ ऑक्टोबर, २०१८**

वाचावे :- १) शासन निर्णय क्रमांक:असंक-१००४/प्र.क्र.१२(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दि.०४.१०.२००४

२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. एफडीएम-२०१८/प्र.क्र. २८/फ-२, दि. २१.०३.२०१८

३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-३/योजनेत्तर/प्र.क्र.२१/१७-१८/२२३०, दि. २८.०२.२०१८.

४) शासन निर्णय,वित्त विभाग, क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि. ०७.०९.२०१८

५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-३/यो/प्र.क्र.१ /१८-१९/११०१/१८-१९, दि.२४.०९.२०१८

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र वानिकी प्रकल्पाखालील उत्पादन वानिकी कार्यक्रमांच्या अंतर्गत खालील १३ अस्थायी पदांना सन २०१८-१९ मध्ये दि. ०१.०३.२०१८ ते ३०.०९.२०१८ पर्यंत चालू ठेवण्यास संदर्भ क्र. २ येथील दि. २१.०३.२०१८ च्या शासन निर्णयान्वये शासनाची मंजुरी देण्यात आली होती. सदर मुदत दि.३०.०९.२०१८ रोजी संपुष्टात आली आहे. त्याअनुषंगाने खाली दर्शविलेल्या विवरण पत्रातील १३ अस्थायी पदे ही वनविभागाच्या २५०२५ या मंजूर आकृतीबंधात समाविष्ट असल्याने या १३ अस्थायी पदांना संदर्भ क्र.३ व ५ येथील पत्रान्वये प्राप्त प्रस्तावाच्या अनुषंगाने दि.०१.१०.२०१८ ते २८.०२.२०१९ पर्यंत चालू ठेवण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | सहायक वनसंरक्षक | ६ |
| २ | वनक्षेत्र सर्वेक्षक | ६ |
| ३ | सहाय्यक वन सांख्यिकी | १ |
| | **एकूण** | **१३** |

याबाबत वेतनावरील खर्च -प्रधान शीर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन, (योजनेतर) ०१ वनीकरण, १०१ वनसंधारण, विकास व पुननिर्मिती (०२) (०२) कृत्रिम पुनर्निमिती (२४०६ ०१२२) ०१ वेतन या लेखाशीर्षाखाली दर्शविण्यात यावा व सन २०१८-१९ यावर्षी त्याखालील मंजूर होणा-या अनुदानातून भागविण्यात यावा. दि.०१.१०.२०१८ ते दि.२८.०२.२०१९ या कालावधीमध्ये मंजूर पदांचा आढावा घेऊन, सुधारित आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेणे आवश्यक आहे. तसेच आस्थापनेवरील पदांचा आढावा घेवून, सुधारीत आकृतीबंधाचा प्रस्ताव वित्त विभागास सादर करावयाचा असल्याने त्वरीत कार्यवाही करुन शासनास प्रस्ताव सादर करावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय,वित्त विभाग, क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०७.०९.२०१८ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०२५११३३२९५९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Atul Ashok Kode

Digitally signed by Atul Ashok Kode
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a12403ed93b05957cb29b7e95265d3ac52d366233b80405514f23a879132aeec, serialNumber=f0d5ee4c99cc9cbfa8761b3ddc7bd6650bad33302f33a35400ad5aad2291371a, cn=Atul Ashok Kode
Date: 2018.10.25 11:37:53 +05'30'

**(अतुल कोदे)**
सह सचिव
महसूल व वन विभाग

<u>प्रतिलिपी</u> :-

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख) महाराष्ट्र राज्य, नागपूर.

२) अप्पर प्रधान मुख्य वनसंरक्षक (सर्व).

३) मुख्य वनसंरक्षक, मध्यवर्ती मुल्यांकन घटक, नागपूर.

४) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता)/ लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.

५) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य,नागपूर.

६) वित्त विभाग, व्यय १०/अर्थसं-६, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

७) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

८) जिल्हा कोषागार अधिकारी, यवतमाळ/नागपूर/चंद्रपूर/पुणे/नाशिक/औरंगाबाद

९) कार्यासन अधिकारी, ब-१ महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

१०) निवडनस्ती, फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.